वित्तीय वर्ष २०२४-२५
**"उत्कृष्ट मराठी नाटकांचे पुराभिलेख" या योजनेतंर्गत निवड करण्यात आलेल्या नाटकांचे जतन, व संवर्धन चित्रीकरण पश्चात प्रक्रीया यासाठी होणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : पुलदे-२०२५/ प्र.क्र.२०(ई-९५११८३)/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२५

वाचा : १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. पुलदे-२०२२ /प्र.क्र.१९५ /सां.का.२, दि.१०.०३.२०२३
२.पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. पुलदे-२०२२/ प्र.क्र.१९५ /सां.का.२, दि.१९.०१.२०२४.
३. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांची अनुक्रमे जा.क्र. पुलदे/दुर्मिळ नाटक/२०२५/४३१, दि. २८.०३.२०२५.

**प्रस्तावना :**

मराठी रंगभूमीवर सादर झालेल्या उत्कृष्ट व दर्जेदार मराठी नाटकांचे चित्रीकरण करून त्याचा अभिलेख संग्रह जतन व संवर्धन करणे उद्दीष्ट आहे. मराठी रंगभूमीस दीडशेहून अधिक वर्षांची परंपरा आहे यापूर्वी अनेक परंपरागत जुनी व दर्जेदार नाटके काळाच्या ओघात लुप्त झाली आहेत व त्या लुप्त झालेल्या नाटकांबरोबर त्या काळातील कलाविष्कारही काळाच्या आड गेल्याने त्या कलाकृती उपलब्ध होण्यास दुरापास्त झालेल्या आहेत. त्या दर्जेदार नाटकांच्या कलाकृती (जुन्या व नव्या) पुनःश्च व पुनरुज्जीवीत करुन त्या Digitization च्या माध्यमातून आधुनिक तंत्राद्वारे जतन करुन ठेवल्यास सदरची जुनी नाटके नाट्यप्रेमी लोकांना त्याचा आस्वाद घेता येईल, भावी पिढयांना उत्कृष्ट कलेचे ज्ञान होईल, सहजगत्या उपलब्ध होतील तसेच सांस्कृतिक वारसा व चळवळ अधिक बळकट व वृध्दींगत होण्यास मदत होईल. याकरीता मराठी रंगभूमीवर सादर करण्यात येणाऱ्या उत्कृष्ट मराठी नाटकांचे एम.एम १६ चित्रीकरण करुन उत्कृष्ट मराठी नाटकांच्या अभिलेखांचा एक संग्रह करुन मराठी नाटयकलेचा वारसा भावी पिढयांसाठी जतन करुन ठेवण्याच्या दृष्टीने, "उत्कृष्ट मराठी नाटकांचे पुराभिलेख" ही योजना पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाकडून राबविण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सन १९६०-९० दरम्यानच्या कालावधीतील ३ जुन्या, दुर्मिळ दर्जेदार मराठी नाटकांचे जतन, चित्रीकरण(निर्मिती), निर्मिती पश्चात प्रक्रीया यासाठी होणा-या

अंदाजित खर्च रु. २६,८३,०००/-(अक्षरी रुपये सव्वीस लक्ष त्र्याऐंशी हजार फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची विनंती उपरोक्त संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी केली आहे. त्यानुसार सदरहु प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सदर शासन निर्णयान्वये, **"उत्कृष्ट मराठी नाटकांचे पुराभिलेख"** या योजनेअंतर्गत पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या दि.१०.०३.२०२३ च्या शासन निर्णयान्वये गठीत उपसमितीने निवड केलेल्या दिग्दर्शकांकडून खालील तक्त्यात नमूद (सन १९६०-१९९० या कालावधीतील) तीन नाटकांचे दिग्दर्शन करुन घेण्यास व सदर नाटकांच्या रंगीत तालमी,चित्रीकरण (निर्मिती) व निर्मिती पश्चात प्रक्रीया यासाठी होणा-या रु. २६,८३,०००/- (अक्षरी रुपये सव्वीस लक्ष त्र्याऐंशी हजार फक्त) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाटकाचे नाव | दिग्दर्शक |
|---|---|---|
| १ | संगीत तानसेन (रणजीत देसाई) | पं. मुकुंद मराठे |
| २ | मुख्यमंत्री (वि.वा. शिरवाडकर) | प्राजक्त देशमुख |
| ३ | निम्मा शिम्मा राक्षस (रत्नाकर मतकरी) | राजेश देशपांडे |

**अटी व शर्ती खालीलप्रमाणे :-**

- सदर योजनेतंर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात निवड करण्यात आलेल्या नाटकाची संहिता ही सन १९६० ते सन १९९० च्या दरम्यानचीच असावी.
- या पूर्वी सदर नाटकांचे कुठेही चित्रीकरण झालेले नसावे.
- सदर योजनेतंर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात निवड करण्यात आलेली नाटके महाराष्ट्र राज्याच्या सांस्कृतिक कार्य विभागातर्फे छायाचित्रित तसेच दूरदर्शन सह्याद्री किंवा युटयुब सारख्या समाजमाध्यमांवर प्रसिध्द वा छायाचित्रित झालेली नसावीत.
- नाटकाचे चित्रीकरण करण्यासंबंधीचे हक्क आणि परवानगी संबंधित दिग्दर्शक/निर्मात्याला प्राप्त झालेले आहेत ते लेखी कळविणे आवश्यक आहे. त्यासंबंधीचे कागदपत्रे पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना सादर करणे आवश्यक आहे.
- सादर करण्यात येणाऱ्या नाटकासाठी पारित झालेले रंगभूमी परिनिरीक्षण मंडळाचे प्रमाणपत्र जोडणे आवश्यक आहे.

०२. सदरचा खर्च मागणी क्र. "झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, ०३ मराठी चित्रपट महोत्सव (०३) (०४) उत्कृष्ट मराठी नाटकांचे पुराभिलेख (२२०५ १५६१) योजना -५० इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३.   यासाठी संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४.   सदर प्रस्तावास, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग दोन, दिनांक १७ एप्रिल,२०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-एक, उपविभाग तीन, अ.क्र.४, नियम क्र. २७(२) (अ) अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०५.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३२८१५०२५९१९२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARSRAM NANDRAM BAHURE

Digitally signed by PARSRAM NANDRAM BAHURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ef62741544bc4d8832eecfb2b7ea295e8a6fcdfe9faffcfda201c87e1c73881b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5FD2A6873F4AE5B1D9EA7DD52E449E02A942EA90145BAEAB72C63CED6D659844, cn=PARSRAM NANDRAM BAHURE
Date: 2025.03.28 15:03:47 +05'30'

**(परसराम बहूरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२.अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सां.का.२), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता महाराष्ट्र-१, मुंबई.
५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७.संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई.
८.अवर सचिव/कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९.अवर सचिव/कक्ष अधिकारी (सां.का.२), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती, सां.का.२.